ए.आ.वि.प्र., गडचिरोली अंतर्गत इंदिरा शिक्षण संस्था, आरमोरी, जि. गडचिरोली संचलित अनुदानित (इंदिरा) आश्रमशाळा, सुकाळा ता. आरमोरी जि. गडचिरोली ही अनुदानित प्राथमिक आश्रमशाळा (१ ली ते ७ वी चे वर्ग) संस्थेच्या मागणीनुसार बंद करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः अआशा-२०२१/प्र.क्र.१६७/का-११**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक :- १९ एप्रिल, २०२३

**वाचा:**

१) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. व्हिएएस-१०९०/प्र.क्र.१०८०/का.११, दि.२६.०३.१९९१.
२) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. पोबेशा.२००२/प्र.क्र.९८/२००२/का.११, दि.१०.०३.२००३.
३) आदिवासी विकास विभाग, शासन निर्णय क्र. अआशा-२०१९/प्र.क्र.१०२/का-११, दि. ११.०६.२०१९.
४) अध्यक्ष, इंदिरा शिक्षण संस्था, आरमोरी, जि. गडचिरोली यांचे क्र इंशिसं/अआशासुकाळा/बंद-प्रस्ताव-कार्यवाही/२०५१/२०२२, दिनांक १३.०१.२०२२.
५) प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि.प्र., गडचिरोली यांचे पत्र क्र.शिक्षण-अनुआशा-२०२२/प्र.क्र./का.४(ब)/३६४/२०२२, दि. १४.०३.२०२२.
६) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांचे पत्र.क्र.अनुआशा-२०२२/प्र.क्र./का.३(४)/२३९३, दि.०२.०५.२०२२.
७) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचे पत्र क्र. अनुआशा-२०१९/प्र.क्र.१६/का.७ (३)/३६२९ दि. ३०.०६.२०२२.

**प्रस्तावना-**

अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर विभागांतर्गत प्रकल्प अधिकारी,ए.आ.वि.प्र., गडचिरोली अंतर्गत इंदिरा शिक्षण संस्था आरमोरी जि. गडचिरोली व्दारा संचलित अनुदानित (इंदिरा) प्राथमिक आश्रमशाळा, सुकाळा, ता. आरमोरी, जि. गडचिरोली ही अनुदानित प्राथमिक आश्रमशाळा सुरु करण्यास दिनांक २६ मार्च, १९९१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. तसेच दिनांक १० मार्च, २००३ च्या शासन निर्णयान्वये सदर अनुदानित आश्रमशाळेची श्रेणीवाढ करुन माध्यमिक आश्रमशाळा मंजूर करण्यात आली. इंदिरा शिक्षण संस्था आरमोरी, जि. गडचिरोली या संस्थेने दिनांक १३ जानेवारी,२०२२ पत्रान्वये केलेल्या मागणीच्या अनुषंगाने संदर्भाधिन क्र. ७ येथे नमुद

पत्रान्वये आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांचेकडून प्राप्त झालेला प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय :**

अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर विभागांतर्गत प्रकल्प अधिकारी,ए.आ.वि.प्र., गडचिरोली अंतर्गत इंदिरा शिक्षण संस्था आरमोरी जि. गडचिरोली व्दारा संचलित अनुदानित (इंदिरा) प्राथमिक आश्रमशाळा, सुकाळा, ता. आरमोरी, जि. गडचिरोली ही आश्रमशाळा सुरु करण्यास दिनांक २६ मार्च, १९९१ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली होती. तसेच सदर अनुदानित आश्रमशाळेस दि. १० मार्च, २००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये श्रेणीवाढ करुन माध्यमिक आश्रमशाळा मंजूर करण्यात आली. इंदिरा शिक्षण संस्था आरमोरी जि. गडचिरोली या संस्थेने अनुदानित (इंदिरा) प्राथमिक आश्रमशाळा, सुकाळा, ता. आरमोरी, गडचिरोली या शाळेमध्ये सन २०१५-१६ ते २०१९-२० या वर्षात इयत्ता १ ली ते इयत्ता ७ वी या वर्गात पुरेशा प्रमाणात विद्यार्थी प्रवेशित होत नसल्यामुळे दिनांक ११.०७.२०२१२ रोजी घेतलेल्या ठरावाच्या अनुषंगाने आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी दिनांक ३०.०६.२०२२ रोजी सादर केलेल्या प्रस्तावानुसार अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर व प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि., गडचिरोली यांनी अनुदानित आश्रमशाळा, सुकाळा येथील इयत्ता १ ली ते इयत्ता ७ वी पर्यंतचे वर्ग संख्येअभावी बंद करण्यास हरकत नसल्याबाबत कळविले आहे. त्यानुसार संस्थेने केलेली मागणी व त्यासंदर्भात आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक, अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर व प्रकल्प अधिकारी, ए.आ.वि., गडचिरोली यांनी दिलेले अभिप्राय विचारात घेता, इंदिरा शिक्षण संस्था, आरमोरी जि. गडचिरोली व्दारा संचलित अनुदानित (इंदिरा) प्राथमिक आश्रमशाळा सुकाळा ता. आरमोरी, जि. गडचिरोली ही प्राथमिक आश्रमशाळा (इयत्ता १ ली ते इयत्ता ७ वी चे वर्ग) शैक्षणिक वर्ष २०२३-२४ पासून बंद करण्यास खालील अटी व शर्तीच्या अधिन राहुन मान्यता देण्यात येत आहे.

(१) अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांनी अनुदानित (इंदिरा) प्राथमिक आश्रमशाळा, सुकाळा, ता. आरमोरी, जि. गडचिरोली या प्राथमिक आश्रमशाळेतील इयत्ता १ ली ते इयत्ता ७ वीच्या वर्गातील विद्यार्थ्यांचे समायोजन नजीकच्या शासकीय किंवा अनुदानित आश्रमशाळेत तात्काळ करावे.

(२) अनुदानित (इंदिरा) प्राथमिक आश्रमशाळा, सुकाळा, ता. आरमोरी, जि. गडचिरोली ही आश्रमशाळा ( इयत्ता १ ली ते इयत्ता ७ वी वर्ग ) बंद केल्यामुळे अतिरिक्त ठरणाऱ्या कर्मचाऱ्यांना संस्थेमार्फत चालविण्यात येणाऱ्या इतर अनुदानित आश्रमशाळेमध्ये तात्काळ समायोजन करावे.

(३) संस्थेने असे समाजायोजन करताना शासनाकडून आश्रमशाळा, शिक्षक/ शिक्षकेतर कर्मचारी, वेतन /वेतनेत्तर अनुदान, इ. बाबत वेळोवेळी विहित करण्यात येणारे अधिनियम, नियम, आदेश इ. चे पालन करणे संस्थेस बंधनकारक राहील.

(४) आदिवासी विकास विभागांतर्गत स्वयंसेवी संस्थाकडून चालविल्या जाणाऱ्या अनुदानित आश्रमशाळांमधील अतिरिक्त ठरलेल्या शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या समायोजनाबाबतची कार्यवाही शासन निर्णय दिनांक ११ जून, २०१९ मधील तरतुदींनुसार करण्यात यावी.

(५) अतिरिक्त कर्मचाऱ्यांपैकी संस्थेमार्फत चालविण्यात येणाऱ्या शाळेमध्ये समायोजन केल्यानंतर समायोजन न झालेल्या कर्मचाऱ्यांबाबतची माहिती तात्काळ अपर आयुक्त, आदिवासी व संबंधित प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास यांना सादर करण्यात यावी.

**२.** अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर यांनी सर्व बाबी तपासून व आवश्यक असल्यास वरील अटी/शर्ती व्यतिरिक्त अटींचा समावेश करून पुढील कार्यवाही ३० दिवसांत करावी व त्याबाबत शासनास अवगत करावे.

**३.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०४२५१५४०४६२०२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

UDAY GANPAT
GAWAS

Digitally signed by UDAY GANPAT GAWAS
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=d99ad92d2ef92f97f483127c546b50d831cbc0858b00a86d17202dbe2e19d646, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=9CE356F38C6A70A8FFDE299AD6627F48BD01E875A7ACA38BD139B0CC5367E62D, cn=UDAY GANPAT GAWAS
Date: 2023.04.25 15:47:58 +05'30'

**( उदय गवस )**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा. मंत्री (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, नाशिक.
३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर
४. प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, गडचिरोली
५. जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
८. अध्यक्ष/सचिव, इंदिरा शिक्षण संस्था आरमोरी, गुजरी चौक, मेन रोड, जि. गडचिरोली.